**महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे व एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्या अधिपत्याखालील उपआयुक्त या गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांची दि. ०१.०१.२०२४ रोजीची तात्पुरती सेवाजेष्ठता यादी प्रसिध्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग

शासन परिपत्रक क्रमांक : मबाआ-२०२४/प्र.क्र. ५१/कार्या-७

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २२ एप्रिल, २०२४.

संदर्भ :-१. सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्र. एसआरव्ही-२०१६/ प्र.क्र.२८१/१२, दिनांक.२१.६.२०२१.

२. शासन परिपत्रक क्रमांक : -मबाआ-२०२३/प्र.क्र.२५/का-७, दि.१५.२.२०२४.

**शासन परिपत्रक**

सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २१.६.२०२१ च्या शासन अधिसूचनेनुसार प्रत्येक वर्षी दिनांक १ जानेवारी हा आधारभूत दिनांक मानून सेवाज्येष्ठता यादी प्रसिध्द करणे आवश्यक आहे.

२. शासन परिपत्रक क्रमांक मबाआ-२०२३/प्र.क्र.२५/का-७, दि.१५.२.२०२४ नुसार महिला व बाल विकास आयुक्तालयांतर्गत कक्षाकडील उपआयुक्त गट-अ या संवर्गातील दिनांक ०१.०१.२०२३ ची अंतिम सेवा जेष्ठता यादी निर्गमित करण्यात आली आहे.

३. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे व आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई या कार्यालयातंर्गत कार्यरत असलेल्या अधिकारी/कर्मचारीवृंद यांच्या प्रकरणातील प्रशासकीय व आस्थापनाविषयक / सेवाविषयक बाबी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांच्याकडून हाताळण्यात येतात. या दोन्ही आयुक्तालयातील अधिकाऱ्यांची त्यांच्या आपआपसांतील क्रम त्यांच्या संबंधित पदावरील मूळ कार्यालयाकडील जेष्ठता, महाराष्ट्र नागरी सेवा (जेष्ठता विनियमन) नियम, १९८२ मधील तरतूदींनुसार व सदर अधिकाऱ्यांच्या बाबतीत अंतिम जेष्ठता सूची यासंदर्भात निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णय / शासन परिपत्रक/ अधिसूचना यानुसार उप आयुक्त, गट-अ संवर्गातील दि.३१.१२.२०२३ अखेर पर्यंतची एकत्रित तात्पुरती सेवा जेष्ठता यादी सोबतच्या अनुक्रमे परिशिष्ट-१ नुसार प्रसिध्द करण्यात येत आहे.

४. सर्व संबंधित अधिकाऱ्यांनी सेवाजेष्ठता यादीचे अवलोकन करुन या सेवाजेष्ठता यादीत काही आक्षेप/त्रुटी अथवा सुधारणा असल्यास याबाबत त्यांनी आपले सविस्तर निवेदन योग्य त्या कागदपत्रासहित शासनाकडे १५ दिवसांच्या आत लेखी सादर करावे. अशा प्रकारे शासनास प्राप्त झालेल्या निवेदनावर गुणानुक्रमे विचार करुन योग्य तो निर्णय घेण्यात येईल व त्यानंतर सेवाजेष्ठता यादी

अंतिम स्वरुपात प्रसिध्द करण्यात येईल. १५ दिवसांच्या आत कोणतेही निवेदन प्राप्त न झाल्यास या सेवाजेष्ठता यादीच्या संदर्भात संबंधित अधिकाऱ्यांना आपले कोणतेही म्हणणे मांडावयाचे नाही असे गृहीत धरुन सदर सेवाजेष्ठता सूची अंतिम स्वरुपात प्रसिध्द करण्यात येईल.

५. शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२४०४२२१२२७४०७६३० असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA T BHALWANE

Digitally signed by RAJENDRA T BHALWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=38d121bf4a170d16dacf98520f0ac44551976931d2758148ccaa24d1fb27b9df, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BADFC0DAA40CC485400AAD9CEABCD514095659A6CDFAC856815518DCD188C23A, cn=RAJENDRA T BHALWANE
Date: 2024.04.24 11:54:21 +05'30'

**(रा. ता. भालवणे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई.
सर्व संबंधित अधिकारी (आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत).
सामान्य प्रशासन विभाग (का-१२) (का-१६) मंत्रालय मुंबई-३२.
निवड नस्ती का-७.

परिशिष्ट-१

महाराष्ट्र नागरी सेवा (जेष्ठतेचे विनियमन) नियमावली २०२१ मधील परिशिष्ट - ३

१. संवर्गाचे नाव -गट- अ (उपआयुक्त)

२. वेतन श्रेणी - ६७७००-२०८७०० (S-२३ )

३. दिनांक १ जानेवारी २०२४ रोजीची अंतिम ज्येष्ठतासुची (दिनांक १.१.२०२३ ते ३१.१२.२०२३ रोजी कार्यरत अधिकारी)

| नियम ३ (२) (ब) नुसार ज्येष्ठता क्रमांक | शासकीय कर्मचाऱ्याचे नांव | संबधित पदावरील नियुक्तीचा मार्ग | जन्म दिनांक (दिनांक/ महिना/वर्ष) | प्रवर्ग | नियम ३ (२) (अ) नुसार संवर्गात प्रत्यक्ष रुजु दिनांक | ज्येष्ठता दिनांक / ज्येष्ठतेचा मानीव दिनांक | सेवानिवृतीचा दिनांक | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | श्री.एस.व्ही. शिंगणे | पदोन्नती | १३.३.१९६५ | खुला | १४.६.२०२१ | १४.६.२०२१ | ३१.०३.२०२३ | सेवानिवृत्त. |
| २ | श्री.आर.एस. मोरे | पदोन्नती | १९.५.१९७० | अ.जा | १४.६.२०२१ | १४.६.२०२१ | ३१.५.२०२८ | मा. सर्वोच्च न्यायालय, दिल्ली येथील विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७ वरील अंतिम निर्णयाच्या **अधिन** राहून तात्पुरती पदोन्नती. |
| ३ | श्री.जी.व्ही. देवरे | पदोन्नती | २.१२.१९६५ | इ.मा.व | १४.६.२०२१ | १४.६.२०२१ | ३१.१२.२०२३ | सेवानिवृत्त. |
| ४ | श्रीम.एस.डी. देशमुख | पदोन्नती | १२.६.१९६७ | खुला | १४.६.२०२१ | १४.६.२०२१ | ३०.०६.२०२५ | मा. सर्वोच्च न्यायालय, दिल्ली येथील विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७ वरील अंतिम निर्णयाच्या **अधिन** राहून तात्पुरती पदोन्नती. |
| ५ | श्री. एस. एच. माने | पदोन्नती | ५.७.१९६८ | वि.जा (अ) | ३०.१२.२०२१ | ३०.१२.२०२१ | ३१.०७.२०२६ | मा. सर्वोच्च न्यायालय, दिल्ली येथील विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७ वरील अंतिम निर्णयाच्या **अधिन** राहून तात्पुरती पदोन्नती. |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ६ | श्रीम. एस.डी. लोंढे | पदोन्नती | २.६.१९७८ | अनु. जमाती | ३०.८.२०२२ | ३०.८.२०२२ | ३०.०६.२०३६ | मा. सर्वोच्च न्यायालय, दिल्ली येथील विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७ तसेच मा. उच्च न्यायालय, मुंबई रिट याचिका क्र. १९२/२०२२ च्या अंतिम निर्णयाच्या **अधिन** राहून तात्पुरती पदोन्नती. |
| ७ | श्रीम. व्ही.एस. पवार | पदोन्नती | १७.१.१९७६ | इ.मा.व | ३०.८.२०२२ | ३०.८.२०२२ | ३१.०१.२०३४ | मा. सर्वोच्च न्यायालय, दिल्ली येथील विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७ तसेच मा. उच्च न्यायालय, मुंबई रिट याचिका क्र. १९२/२०२२ च्या अंतिम निर्णयाच्या **अधिन** राहून तात्पुरती पदोन्नती. |
| ८ | श्री. व्ही. जी. क्षीरसागर | पदोन्नती | ४.३.१९७० | अ. जाती | १०.२.२०२३ | १०.२.२०२३ | ३१.३.२०२८ | मा. सर्वोच्च न्यायालय, दिल्ली येथील विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७ तसेच मा. उच्च न्यायालय, मुंबई रिट याचिका क्र. १९२/२०२२ च्या अंतिम निर्णयाच्या **अधिन** राहून तात्पुरती पदोन्नती. |
| ९ | श्रीम. एस. जी. पवार | पदोन्नती | १६.१२.१९६९ | अ. जाती | ३०.८.२०२३ | ३०.८.२०२३ | ३१.१२.२०२७ | मा. सर्वोच्च न्यायालय, दिल्ली येथील विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७ तसेच मा. उच्च न्यायालय, मुंबई रिट याचिका क्र. १९२/२०२२ च्या अंतिम निर्णयाच्या **अधिन** राहून तात्पुरती पदोन्नती. |